**परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन / राष्ट्रीय निवृत्तीवेतन**
**<u>योजनेंअंतर्गत सानुग्रह अनुदान मंजूर करण्याबाबत</u>.**
**दिवंगत संदीप महादेवराव ढाले (तलाठी)**



**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**


मंत्रालय (मुख्य इमारत), पहिला मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई- ४०० ०३२
दुरध्वनी क्र. (०२२) २२७९३७५४ Email: doe10.rfd@maharashtra.gov.in


**क्रमांक : सानुग्र-२०२१/प्र.क्र.१३६/ई-१०** **दिनांक : १० मार्च, २०२२**

<u>वाचा :</u> १) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : अंनियो-२०१७/प्र.क्र.२९/सेवा-४, दि.२९/०९/२०१८
२) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे पत्र क्रमांक/आकाअ/भूसु/अ.का.२/प्र.क्र.४४-२०/२०२०, दि.०२/०६/२०२० व दि.०६/०७/२०२१ अन्वये सानुग्रह अनुदान मंजुरीचा सादर केलेला प्रस्ताव.
३) कै. संदीप महादेवराव ढाले (मयत तलाठी) यांचे नामनिर्देशित व्यक्ती / कायदेशीर वारसदार श्रीमती विजया संदीप ढाले यांचा परिभषित अंशदान निवृत्तीवेतन योजना/राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेअंतर्गत सानुग्रह अनुदान मिळण्याकरिता प्राप्त झालेला दिनांक २१/०५/२०१९ रोजीचा अर्ज.

## <u>आदेश</u>

उपरोक्त संदर्भ क्रमांक (२) अन्वये विभागीय आयुक्त, अमरावती यांच्याकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावासोबत श्रीमती विजया संदीप ढाले यांच्या उपरोक्त संदर्भ क्रमांक (३) येथे नमूद केलेल्या अर्जाच्या अनुषंगाने प्रशासकीय विभाग प्रमुख हे त्यांना संदर्भ क्र.(१) येथील वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक:- अंनियो-२०१७/प्र.क्र.२९/सेवा-४, दि.२९/०९/२०१८ अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारानुसार, कै. संदीप महादेवराव ढाले (मयत तलाठी) यांच्या नामनिर्देशित व्यक्तीस / कायदेशीर वारसास श्रीमती विजया संदीप ढाले यांना सानुग्रह अनुदान रुपये १०,००,०००/- (अक्षरी रुपये दहा लाख फक्त) मंजूर करीत आहेत.

सदर “सानुग्रह अनुदान” शासकीय कर्मचारी सेवेत असताना १० वर्षे शासन सेवा होण्यापूर्वी दिनांक १९/०४/२०१३ रोजी मृत्यू पावल्यामुळे मंजूर करण्यात येत आहे. सदर आदेश आदेशाच्या दिनांकापासून १ वर्षे कालावधीसाठी ग्राहय राहतील.

सदर खर्च “मागणी क्र.जी-६, २०७१-निवृत्तीवेतन व इतर सेवानिवृत्ती लाभ ०१ नागरी, १०३, अनुकंपा भत्ते, (००)(०६)-परिभाषित अंशदान / राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेंतर्गत सानुग्रह अनुदान (२०७१०७२२)” या लेखाशीर्षखाली खर्ची टाकण्यात यावा.

सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेताक २०२२०३१११०५५४८९०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

SANJAY BANKAR
Digitally signed by SANJAY BANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c8a7d6860ff227fd9e69a02e9ca5dfb2ccb25eda92d749629970f349fc6ed260, pseudonym=B37546F6A6BD466ED45270ED708F924F51A07EA8, serialNumber=C5917E56B0DA516AB259D846D516CB0584DCE5E9A2E73C0A35FA47BAB64E88AA, cn=SANJAY BANKAR
Date: 2022.03.11 10:57:55 +05'30'

**(संजय बनकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति: माहिती तथा पुढील उचित कार्यवाहीस्तव अग्रेषित,
(१) विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती.
(२) जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला (दोन प्रती)
(३) तहसिलदार, तहसिल कार्यालय, तेल्हारा, जिल्हा अकोला.
(४) श्रीमती विजया संदीप ढाले, योगीराज शेती कमान, खादन सांगली, ता.जि.सांगली.
(५) निवड नस्ती (कार्यासन ई-१०)